**जिल्हा समादेशक पदावर नियुक्ती करण्यासंदर्भात निवड समिती व चिकित्सक समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग (विशेष)**

**शासन निर्णय क्रमांकः एचजीएस २००५/१०३८/प्र.क्र.३/विशा.८**
मंत्रालय, मुंबई ४०००३२, दिनांक : १४ जुलै, २००५

**वाचा :** १) महासमादेशक, होमगार्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयाचे पत्र क्र.मस/आस्था/०४/५१५५, दि.२८.१०.२००४ व अ.शा.पत्र क्र.सीजी/०१/०४/५९१३, दिनांक २७.४.२००४ तसेच क्रमांक. मस/०१/०४/५९१३, दिनांक १७.१२.२००४.
२) शासन अधिसुचना क्रमांक . एचजीएस ०१७६/४३९३/विशा-७, दि.१८.१२.८५.

**प्रस्तावना :** मुंबई होमगार्ड अधिनियम १९४७ मधील कलम २(२) च्या पोटकलम(१) नुसार शासन प्रत्येक जिल्ह्याच्या होमगार्डसाठी एक कमांडंट (जिल्हा समादेशक) नेमील अशी तरतूद आहे. त्याचप्रमाणे शासन अधिसूचना दिनांक १८.१२.१९८५ अनुसार कलम २(ए) प्रमाणे जिल्हा समादेशक नियुक्तीच्या अटी व शर्ती नियम-८ प्रमाणे जिल्हा समादेशकाचा नियुक्ती कालावधी विहित करण्यात आलेला आहे. सदर तरतुदीच्या अनुषंगाने जिल्हा समादेशक या मानसेवी पदी नियुक्ती संदर्भात संबंधीत जिल्ह्याच्या जिल्हाधिकाऱ्याकडून उमेदवाराच्या नावाचा प्रस्ताव मागविण्यात येतो. संबंधित जिल्हाधिकारी वृत्तपत्रात जाहिरात देवून इच्छूक उमेदवारांचे अर्ज मागवितात व त्यासाठी ते मुदत निर्धारित करतात. त्यानुसार प्राप्त अर्जाची छाननी करुन उमेदवारांच्या अटनिहाय प्रमाणपत्रासह अभिप्राय नोंदवून प्रस्ताव महासमादेशक, होमगार्ड यांचेकडे पाठविण्यात येतो व महासमादेशक प्रस्तावाची छाननी करुन शिफारशीसह प्रस्ताव शासनास सादर करतात. अशा प्रकारे प्राप्त झालेल्या प्रस्तावामधील अटी व शर्ती पूर्ण करणाऱ्या उमेदवारांपैकी एकाची नियुक्ती जिल्हा समादेशक पदी करण्यात येते.

याप्रमाणे कार्यवाही करुन जिल्हा समादेशक पदी नियुक्ती करण्यासाठी विलंब होतो असे शासनास दिसून आल्याने ही बाब विचारात घेऊन वरील कार्यपध्दतीमध्ये बदल करण्याचा प्रश्न विचाराधीन होता.

**शासन निर्णय :** जिल्हा समादेशक, होमगार्ड पदावरील नियुक्तीबाबत खालील प्रमाणे जिल्हा निवड समिती स्थापन करण्यास शासन मंजूरी देत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १) | महासमादेशक, होमगार्ड, | अध्यक्ष |
| २) | संबंधीत जिल्हाधिकारी, | सदस्य |
| ३) | संबंधित जिल्हा पोलीस अधिक्षक, | सदस्य |
| ४) | पोलीस आयुक्तालय असल्यास, त्यांनी नामनिर्देशित केलेल्या पोलीस उपआयुक्त दर्जाचे अधिकारी. | सदस्य |
| ५) | पोलीस आयुक्तालय नसल्यास परिक्षेत्रीय विशेष पोलीस महानिरीक्षक यांनी नामनिर्देशित केलेले परिक्षेत्रातील अन्य जिल्ह्याचे पोलीस अधिक्षक दर्जाचे अधिकारी. | सदस्य |
| ६) | होमगार्ड विषयाशी संबंधीत उप सचिव, गृह विभाग. | सदस्य सचिव |

मुंबई शहरात जिल्हा पोलीस अधिक्षकांचे पद अस्तित्वात नसल्याने जिल्हाधिकारी, मुंबई शहर व उपनगरे हे मुंबई शहरासाठी समादेशक नियुक्त करण्याच्या निवड समितीवर सदस्य म्हणून काम करतील.

वरील जिल्हा निवड समितीने शिफारस केलेल्या ३ उमेदवारांपैकी एकाची निवड करण्यासाठी शासन स्तरावर एक चिकित्सक समिती स्थापन करण्यात येत असून त्याचे अध्यक्ष / सदस्य खालीलप्रमाणे राहतील:-

| | | |
|---|---|---|
| १) | मा. मंत्री (गृह) | अध्यक्ष |
| २) | मा. राज्यमंत्री (गृह) | सदस्य |
| ३) | सबंधित जिल्हा पालकमंत्री | सदस्य |
| ४) | अपर मुख्य सचिव (गृह) | सदस्य |
| ५) | होमगार्ड विषयाशी संबंधित सचिव/प्रधान सचिव, गृह विभाग. | सदस्य |
| ६) | महासमादेशक होमगार्ड | सदस्य |
| ७) | होमगार्ड विषयाशी संबंधित उप सचिव, गृह विभाग | सदस्य सचिव |

सध्याच्या प्रचलित पध्दतीनुसार जिल्हाधिकारी जाहिरात देऊन अर्ज मागवितात. ती पध्दत चालू राहील. यापुढे त्या अर्जाची छाननी जिल्हा निवड समिती करेल व ३ उमेदवारांच्या नावांची शिफारस शासन स्तरावरील चिकित्सक समितीला करेल. त्यामधून चिकित्सक समिती जिल्हा समादेशक, होमगार्ड पदासाठी एका उमेदवाराची निवड करेल व शासनास शिफारस करील.

या आदेशाच्या दिनांकापासून ही कार्यपध्दती अवलंबिण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( क. गो. देशपांडे )
उप सचिव, गृह विभाग (विशेष), महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) मा. मंत्री (गृह) यांचे स्वीय सहाय्यक.
२) मा. राज्यमंत्री (गृह) यांचे स्वीय सहाय्यक.
३) मा. सर्व जिल्हा पालकमंत्री यांचे स्वीय सहाय्यक.
४) अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहाय्यक.
५) सचिव व प्रधान सचिव, गृह विभाग यांचे स्वीय सहाय्यक
६) सर्व जिल्हाधिकारी.
७) सर्व पोलीस आयुक्त,
८) महासमादेशक, होमगार्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९) सर्व परिक्षेत्रांचे विशेष पोलीस महानिरीक्षक.
१०) सर्व पोलीस अधिक्षक,
११) गृह विभागातील सर्व कक्ष अधिकारी/कार्यासने.
१२) उप सचिव, विशेष शाखा-८, गृह विभाग, मंत्रालय,
१३) निवड नस्ती, कार्यासन विशा-८, गृह विभाग.

-------